**मा. उच्च न्यायालयाच्या निरीक्षण विभागातील निरीक्षण पथकाच्या अधिकारी / कर्मचारी यांना सुधारीत दराचा दैनिक भत्ता (Daily Allowance) अनुज्ञेय करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रवास-२०१८/प्र.क्र.९/सेवा-५**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०७ डिसेंबर, २०१८

वाचा-

प्रबंधक (निरीक्षण-१) उच्च न्यायालय, अपीलीय शाखा, मुंबई यांचे क्रमांक अे (स्पेशल) ०४०४/३३८/२०१८, दि.१५.१०.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना**-

मा. उच्च  न्यायालयाने भारतीय संविधानाच्या कलम २२७ नुसार त्यांच्या अखत्यारीतील दुय्यम न्यायालयांवर देखरेख करण्याची (Inspection) जबाबदारी सोपविण्यात आली आहे. त्यानुसार मा. मुख्य न्यायमुर्ती यांनी मान्य केलेल्या कार्यक्रमानुसार मा. उच्च न्यायालयातील निरीक्षण विभागातील निरिक्षण पथकातील अधिकारी/कर्मचारी यांना महाराष्ट्र तसेच गोवा राज्यातील तसेच दिव, दमन व सिल्वासा या संघराज्यातील १२ ते १६ दुय्यम न्यायालयाची (Courts Subordinate To High Courts) तपासणीचे (Inspection) कामासाठी प्रत्येक महिन्यांमध्ये २ आठवडे, काहीवेळा ३ आठवडे कालावधीसाठी जावे लागते. दुय्यम न्यायालयाच्या ठिकाणी मा. उच्च न्यायालयाच्या निरीक्षण पथकातील  अधिकारी/ कर्मचारी यांना वास्तव्यासाठी, नाश्ता, दोन वेळचे जेवण व चहापान या करीता येणारा प्रत्यक्ष खर्च हा त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणाऱ्या दैनिक भत्त्याच्या रक्कमेपेक्षा अधिकचा असल्याने, संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना वाढीव दराने दैनिक भत्ता अनुज्ञेय करण्याबाबतचा प्रस्ताव, शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. सदर प्रकरणी सर्वसाकल्याने विचार करुन पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

मा.उच्च न्यायालयाच्या निरिक्षण विभागातील निरीक्षण पथकातील अधिकारी/कर्मचारी यांनी दि. १८.०१.२०१८ पासुन केलेल्या  दुय्यम न्यायालयाच्या तपासणीच्या (Inspection) त्यांना, प्रतिदिन / प्रतिव्यक्ती रु.४५०/- या दराने दैनिक भत्ता दिनांक १८.०१.२०१८ पासुन थकीत असलेल्या देयकांची प्रतिपुर्ती मंजुर करण्यासाठी व यापुढे पुढील आदेश होईपर्यंत संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना नियोजित तपासणी दौऱ्याच्या अनुषंगाने प्रतिदिन / प्रतिव्यक्ती रु.४५०/- या दराने दैनिक भत्ता,

मंजुरीस तसेच सदरबाबीचा खर्च प्रवास भत्ता निधीमधून भागविण्यास देखील या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त तपासणी दौऱ्याव्यतिरीक्त अन्य कोणत्याही दौऱ्याकरीता संबंधितांना शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०३.०३.२०१० मधील तरतुदीनुसार दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०७१२५५४२८१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Devidasrao
Londhe

Digitally signed by Shrikant Devidasrao Londhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=79c7a1a5cbac6bb040957336242ead2e484e7eee68c06c510363ef7c9edf4ac2, serialNumber=b973cbc71c4136d97edeae58395e03da221147d1afdd343ba4d7a2492e6a54b6, cn=Shrikant Devidasrao Londhe
Date: 2018.12.07 12:59:22 +05'30'

**(श्री. दे. लोंढे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
५) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
६) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९) सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नार्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
१०) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
११) *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१२) *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१३) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई,
१४) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६) अधिक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हे
१७) निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-५.

* पत्राने